**दि. १५/६/१९९५ नंतर दिनांक १७/१०/२००१ पर्यंत शासकीय व निमशासकीय सेवेत अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे नियुक्त झालेल्या ज्या कर्मचा-यांचे जात प्रमाणपत्र अवैध ठरले आहे किंवा ज्या कर्मचा-यांनी अद्यापपर्यंत जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नाही अशा कर्मचा-यांच्या सेवेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक : बीसीसी -२०१५/ प्र. क्र. २७६ A/१५/१६-ब**
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
**दिनांक : २१ ऑक्टोबर, २०१५.**

वाचा:-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी १०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब, दि. १५ जून,१९९५
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी २००४/प्र.क्र.४५/०४/१६-ब, दि. २४ जून,२००४
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी २००२/प्र.क्र.९३/०४/१६-ब, दि. ३० जून,२००४
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी २००५/प्र.क्र.२८/०५/१६-ब, दि. १५.१२.२००५ (क्र. बीसीसी २०११/प्र.क्र.९२९/११/१६-ब, दि. ७ जानेवारी, २०१२ च्या शुध्दीपत्रकासह)
५) महाराष्ट्र अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग (जातीचे प्रमाणपत्र देण्याचे व त्याच्या पडताळणीचे विनियमन) अधिनियम, २०००
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक,क्र. बीसीसी -२०१२/ प्र. क्र. ३३२/१२/१६-ब, दि. १८ मे, २०१३.
७) दिनांक ७.८.२०१५ रोजी हलबा समाजाच्या समस्यांबाबत मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीतील निर्णय.

**शासन परिपत्रक :-**

शासन निर्णय दि. १५/६/१९९५ नुसार, अनुसुचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे दि. १५/६/१९९५ पूर्वी शासन सेवेत नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र जर अवैध ठरले व त्यांनी विशेष मागास प्रवर्गाचे **जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र** सादर केले तर, त्यांच्या सेवेस संरक्षण देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. संबंधित अधिकारी / कर्मचारी दि. १५/६/१९९५ रोजी ज्या पदावर कार्यरत होते त्या पदावर त्यांची सेवा जेष्ठता दिनांक १५/६/१९९५ अशी निश्चित करावी असे आदेश शासन निर्णय दि. २४/६/२००४ निर्गमीत केले आहेत.

३. अनुसुचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे दि. १५/६/१९९५ पूर्वी शासन सेवेत नियुक्त झालेल्या मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र जर अवैध ठरले व त्यांनी ते ज्या मागास प्रवर्गाचे आहेत, त्या मागास प्रवर्गाचे **जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र** सादर केले तर, त्यांच्या सेवेस संरक्षण देण्याचा निर्णय दि.३०/६/२००४ च्या शासन निर्णयान्वये शासनाने घेतला आहे व त्यांची सेवा जेष्ठता दि.१५/६/१९९५ अशी निश्चित केली आहे

४. दि. १५/६/१९९५ नंतर अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे शासन सेवेत नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांचे अनुसुचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरल्यास त्यांच्या सेवेस सद्यस्थितीत कोणतेही संरक्षण नाही. दिनांक १५/६/१९९५ नंतर शासन सेवेत नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांचे अनुसूचित जमातीचे

प्रमाणपत्र अवैध ठरल्यास त्यांच्या सेवेसही संरक्षण देण्यात यावे, या मागणीवर विचार करण्यासाठी मंत्रीगट नियुक्त करण्याचा निर्णय मंत्रीमंडळाने दि.२५/२/२००९ च्या बैठकीत घेतला. त्यानुसार शासन निर्णय दि. ५/३/२००९ नुसार मंत्रीगटाची स्थापना करण्यात आली होती त्यानंतर दिनांक ४/३/२०११ च्या शासन निर्णयान्वये तत्कालीन मा.मंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीगटाची पुनर्रचना करण्यात आली होती.

५. दिनांक ४/३/२०११ च्या शासन निर्णयान्वये तत्कालीन मा.मंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली गठित केलेल्या मंत्रीगटाचा अहवाल प्राप्त झाला आहे. सदर मंत्रीगटाच्या शिफारशीच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. यास्तव तत्कालीन महसूल मंत्री, यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या मंत्री गटाने सादर केलेल्या अहवालासंदर्भात शासनाचा पुढील निर्णय होईपर्यंत, दिनांक १५/६/१९९५ नंतर दिनांक १७/१०/२००१ पर्यंत, या कालावधीत अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे शासन सेवेत नियुक्त झालेल्या ज्या कर्मचा-यांचे जात प्रमाणपत्र अवैध ठरले आहे किंवा ज्या कर्मचा-यांनी **जात वैधता प्रमाणपत्र** अद्यापपर्यंत सादर केलेले नाही, अशा कर्मचा-यांना शासन सेवेतून निलंबित करण्यात येऊ नये अथवा त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येऊ नये.

६. वरील सूचना हया दिनांक १५/६/१९९५ नंतर दिनांक १७/१०/२००१ पर्यंत शासन सेवेत अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे नियुक्त झालेल्या कर्मचा-यांपुरत्याच लागू राहतील. आरक्षण कायदा-२००४ मधील कलम ४(१) नुसार अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती, विमुक्त जाती-अ, भटक्या जमाती-ब, भटक्या जमाती-क,भटक्या जमाती-ड, विशेष मागास प्रवर्ग, आणि इतर मागास प्रवर्गासाठी राखून ठेवलेल्या जागा त्या संबंधित प्रवर्गातील उमेदवारांमधून भरणे आवश्यक आहे. या कायदयातील तरतुदीची अंमलबजावणी करण्यासाठी मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांच्या जात प्रमाणपत्राची पडताळणी करणे आवश्यक आहे.

७. सदर शासन परिपत्रक सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील असलेल्या सर्व विभाग प्रमुखांच्या/नियुक्ती प्राधिका-यांच्या निदर्शनास आणावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२११५५११९९५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tikaram Waman Karpate

Digitally signed by Tikaram Waman Karpate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9395c596b57a69fe04109b8c8191e7389cff5eda3fac16c6f8263be7fbbd319d, cn=Tikaram Waman Karpate
Date: 2015.10.21 15:55:27 +05'30'

(टि. वा. करपते)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) राज्यपाल यांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,
३) उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

४) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
७) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अखत्यारीत असलेल्या सर्व जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांना तसेच जात प्रमाणपत्र देणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्यांना उपरोक्त विषयासंदर्भातील परिपत्रकांमधील सूचनानुसार कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात याव्यात.
८) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अखत्यारीत असलेल्या सर्व जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांना तसेच जात प्रमाणपत्र देणाऱ्या सक्षम अधिकाऱ्यांना सदर परिपत्रकाची प्रत पाठवून त्यानुसार कार्यवाही करण्याच्या सूचना द्याव्यात.
९) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग त्यांना विनंती करण्यात येते की जात प्रमाणपत्र देण्यास सक्षम असलेल्या त्यांच्या अधिपत्याखालील अधिकाऱ्यांना उपरोक्त विषयासंदर्भातील परिपत्रकांमधील सूचनानुसार कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात याव्यात.
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) सर्व सहायक आयुक्त (मावक)
१२) सर्व जिल्हाधिकारी,
१३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१४) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई,
१५) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
१६) प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१९) राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
२०) सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
२१) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,
२२) संचालक, समाजकल्याण, पुणे,
२३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
२४) संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
२५) संचालक, सेवायोजन, मुंबई,
२६) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
२७) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
२८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
३०) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

सर्व मंत्रालयीन विभाग, त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांना सदर परिपत्रकाची प्रत,त्यांच्या स्तरावरुन स्वतंत्रपणे पाठवून कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात याव्यात.

३१) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई
३२) निवड नस्ती, कार्यासन १६-ब.

***********